**स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क या पदावर सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत नामनिर्देशनाने तात्पुरती नियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदभ-२०२४/प्र.क्र.८१(५)/सेवा-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०७ मार्च, २०२४.

**<u>संदर्भ</u> :** १. मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.विभाग, मुंबई यांचे क्र.मुअ(मुं)/वि.अ./९९२,दि.२६.०२.२०२४ रोजीचे पत्र.
२. सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्रमांक :एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक (वेतनस्तर एस-८ रुपये २५,५००-८१,१००/- या वेतनश्रेणीत) या संवर्गात नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी या विभागाच्या दि.१३.११.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता (स्थापत्य), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय निवड समिती गठीत करण्यात आली आहे. सदर निवड समितीमार्फत दि.१०.१०.२०२३ रोजी जाहीरात प्रसिध्द करण्यात आली होती. सदर जाहिरातीच्या अनुषंगाने गुणनवत्तेनुसार पात्र ठरलेल्या १३७८ उमेदवारांची यादी गुणवत्ता क्रमांकानुसार www.mahapwd.com या संकेतस्थळावर प्रसिध्द केली असून या उमेदवारांना नियुक्ती देण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक २६.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये शासनास शिफारस केली आहे. याअनुषंगाने सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांना स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या पदावर ते रुजू होतील त्या दिनांकापासून (वेतनस्तर एस-८ रुपये २५,५००-८१,१००/- या वेतनश्रेणीत) तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सोबतच्या **<u>परिशिष्ट-अ</u>** मधील उमेदवारांनी नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्याकडे हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत प्रत्यक्ष संपर्क साधावा व सेवेत रुजू व्हावे. अन्यथा, एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. सदर उमेदवारांना देण्यात आलेल्या पदस्थापनेत कोणताही बदल होणार नाही.

३. सोबतच्या **<u>परिशिष्ट-अ</u>** मधील उमेदवारांना रुजू करुन घेऊन त्यांचे नियुक्तीबाबतचे आदेश संबंधित मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांनी एक आठवडयाच्या आंत निर्गमित करावेत. सदर उमेदवारांना सविस्तर पदस्थापना देतांना संबंधित उमेदवार ज्या जिल्ह्यातील रहिवासी आहे त्याच जिल्ह्यात अन्यथा नजिकच्या जिल्ह्यात त्या उमेदवारास पदस्थापना देण्यात येईल याची दक्षता घेण्यात

यावी.तसेच, पदस्थापना देतांना संबंधित प्रादेशिक विभागाच्या क्षेत्रात येणा-या राष्ट्रीय महामार्ग विभाग कार्यालयांमधील रिक्त पदे आवश्यकतेनुसार भरली जातील याची दक्षता मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकणभवन, नवी मुंबई यांचेशी सल्लामसलत करुन घ्यावी.

४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने सोबतच्या **परिशिष्ट-अ** मधील उमेदवारांची करण्यात आलेली नियुक्ती ही, सार्वजनिक बांधकाम विभागातील स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या पदाच्या सेवाभरती नियमातील तरतुदीनुसार भरतीसाठी उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर, खालील विहित अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

१) एखाद्या उमेदवारास विहित कालावधीत अपरिहार्य, उचित कारणास्तव रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास त्या उमेदवारांनी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १० दिवसांच्या आत अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना मुदतवाढीसाठी अर्ज सादर करावा. तद्नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. उचित कारणास्तव विहित कालावधीत मुदतवाढीसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारांना मुदतवाढ देण्याचा /नाकारण्याचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.

२) जे उमेदवार या शासन निर्णय निर्गमित झालेल्या तारखेपासून **एक महिन्याच्या मुदतीच्या आत** नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणार नाहीत अथवा त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त झाली नाही तर ही नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही असे समजून उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. तसेच या बाबतचा अहवाल मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग /संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ , सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी शासनाला दिनांक ०८.०४.२०२४ पर्यंत सादर करावा.

३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग/संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी जाहीरातीत नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची तसेच शैक्षणिक व अन्य अटींची पुर्तता करणारी मूळ कागदपत्रे (वय, अधिवास, शैक्षणिक पात्रता, महिला आरक्षणानुसार विहीत केलेले प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, दिव्यांग प्रमाणपत्र, माजी सैनिक प्रमाणपत्र, प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्र,भूकंपग्रस्त प्रमाणपत्र, पदवीधर/पदविकाधारक अंशकालीन उमेदवार प्रमाणपत्र, अनाथ प्रमाणपत्र इ.) तपासावीत.

४) सदर उमेदवारांची ज्येष्ठता ही सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.०६.२०२१ रोजीच्या शासन अधिसूचना अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, २०२१ मधील तरतुदीनुसार गुणवत्ता क्रमांकानुसार निश्चित करण्यात येईल. त्यामुळे नियुक्तीच्या आदेशानुसार एक

महिन्याच्या आत सेवेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सेवा ज्येष्ठता गमवावी लागेल व त्यांची ज्येष्ठता ते ज्या दिनांकास शासन सेवेत रुजू होतील, त्या दिनांकास निश्चित करण्यात येईल.

**५)** मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांची प्रचलित नियमातील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. मागासवर्गीय उमेदवारांनी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र शासनास व संबंधित उमेदवारांची नियुक्ती करण्यात आलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार संबंधित उमेदवारांच्या मुळ सेवापुस्तकात नोंद घेण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी.

**६)** तसेच, मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर (अ.जा., अ.ज., वि.जा.(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड), वि.मा.प्र., इ.मा.व.) नियुक्ती करण्यात आलेल्या मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यास, त्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत जात प्रमाणपत्राची वैधता, जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून करुन घेणे आवश्यक राहील. नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयाने संबंधित मागसवर्गीय उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्राच्या अनुषंगाने आवश्यक ती कागदपत्रे जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करावी. विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास संबंधित उमेदवारांच्या सेवा प्रचलित नियमानुसार समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

**७)** अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती वगळता अन्य मागासप्रवर्गातील महिलांकरीता आरक्षित असलेल्या पदावरील निवडीसाठी दावा करु इच्छिणा-या महिलांना त्या-त्या मागास प्रवर्गासांठी इतर मागासप्रवर्ग व बहुजन कल्याण विभाग तसेच सामान्य प्रशासन विभागाकडून वेळोवेळी विहीत करण्यात आल्याप्रमाणे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

८) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय दिनांक २५.०५.२००१ मधील तरतुदीनुसार, मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या उमेदवारांनी, "महिलांसाठी उन्नत व प्रगत व्यक्ती गट (क्रिमीलेअर) यामध्ये मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र " (अलिकडचे/ नवीनतम मूळ नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र) ची सांक्षाकित प्रत तपासणीसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडे पाठविणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांचे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र दोन प्रतीत शासनास पाठविण्याची कार्यवाही या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत मुख्य अभियंता/ संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी करावी. मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांची नियुक्ती सदर तपासणी अहवालाच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडून प्राप्त अहवालानुसार महिला उमेदवार अपात्र ठरत असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

**९)** उमेदवारांनी हिन्दी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. भाषा परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांची वेतनवाढ प्रचलित नियमाप्रमाणे रोखून ठेवण्यात येईल.

**१०)** सदर उमेदवारांपैकी खेळाडू प्रवर्गातून निवड झालेल्या उमेदवारांना शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय, दि.०१.०७.२०१६ मधील तरतुदीनुसार नियुक्ती देण्यात येत आहे. सदर तरतुदींची पूर्तता होत नसल्यास संबंधित उमेदवारांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

**११)** सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९,दि.०७.०८.२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९.०३./२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून २ वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहित मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

**१२)** या आदेशान्वये हजर होणा-या उमेदवारांना राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना (NPS) लागू राहील. तथापि, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदीनूसार दि.०१/११/२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांनी त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१/११/२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नविन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२/०१/२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहील.

**१३)** उमेदवारांनी स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क पदासाठी विहीत केलेली व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**१४)** उमेदवारांनी व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यकांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास तसेच, त्याचे काम किंवा वर्तणूक अयोग्य अथवा अनुरुप असमाधानकारक आढळल्यास, तो सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

**१५)** सदर उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत असणा-या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या दुस-या पदावर नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

**१६)** तसेच सदर उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत नसणा-या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या सेवेत नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क या पदावरील वेतन निश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

**१७)** सदर नियुक्ती, उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्राच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. उमेदवारांनी सादर केलेली प्रमाणपत्रे तसेच सांक्षाकन नमुन्यात नमूद केलेली माहिती, नियुक्तीनंतर खोटी अथवा बनावट आढळल्यास, सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**१८)** उमेदवारांनी साक्षांकन नमुन्यात सादर केलेली माहिती नियुक्ती देण्यात आल्यानंतर असत्य असल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्ती आदेश रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई करुन सदर उमेदवारांना शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

**१९)** उमेदवारांच्या सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

**२०)** आवश्यकता भासल्यास उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन चार वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरवेल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु,

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षाचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा,

(ब)सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

**२१)** उमेदवार सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्याला शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/ ९२/८, दिनांक ०२/१२/१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे मूळ

वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर असणार नाही.

**२२)** सोबतच्या परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३/०९/२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतुदीनुसार दिर्घ कालावधीचे व विदेशी प्रशिक्षणापूर्वी प्रशिक्षणार्थीला सक्षम प्राधिकाऱ्याबरोबर बंधपत्र लिहून द्यावे लागेल व त्याप्रमाणे नंतर प्रशिक्षणार्थी नोकरी सोडत असेल तर प्रशिक्षणावर खर्च झालेली रक्कम सदर प्रशिक्षणार्थीकडून वसूल करून संबंधित प्राधिकाऱ्याला शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल.

**२३)** उपरोक्त वसूली केल्याशिवाय प्रशिक्षणार्थींचा राजीनामा क्षेत्रिय स्तरावरुन स्विकारण्यात येऊ नये. त्यानुसार प्रत्येक प्रशिक्षणार्थीला महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक येथे रूजू होण्यापूर्वी मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे विहित बंधपत्र भरून सादर करणे बंधनकारक राहील.

**२४)** प्रशिक्षणादरम्यान सर्व प्रशिक्षणार्थीकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

**२५)** सर्व उमेदवारांचे वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून त्यांची नियुक्ती करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवार यांनी त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी रुजू झाल्यानंतर त्यांनी वैद्यकीय अहवाल त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयास सादर करावा.

**२६)** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक चारित्र्य-२११७/ प्र.क्र.४८३/ २०१७/१६-अ, दिनांक २८/०८/२०१७ अन्वये सर्व उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवारांची त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी रुजू झाल्यानंतर त्या कार्यालयामार्फत त्यांची चारित्र्य पडताळणी करण्यात येईल.

**२७)** तसेच, जे उमेदवार यापूर्वी अन्य विभागात अथवा या विभागात शासकीय सेवेत कार्यरत होते त्यांच्याबाबतीत ते ज्या विभागात/कार्यालयात कार्यरत होते त्या विभागाकडून/कार्यालयाकडून त्यांच्या विरूध्द कोणती विभागीय चौकशी सुरू होती किंवा प्रस्तावित आहे. याबाबतची माहिती प्राप्त करून घेण्याच्या अधिन राहून त्यांना तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. जर एखाद्या उमेदवारांविरूध्द त्यांनी यापूर्वी कार्यरत असलेल्या विभागात/कार्यालयात विभागीय चौकशी सुरू असल्यास सदर नियुक्तीनंतरही सदर चौकशी सुरू राहील.

२८)उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याकडे पाठवून विभाग प्रमुखांनी अथवा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी याबाबत शासनास कळवावे.

२९) सदर उमेदवार सध्या केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील तर संबंधीत नियंत्रण अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रूजू करून घेता येणार नाही. तसेच सदर उमेदवारांची नियुक्ती ही त्यांचे केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेतील ना-चौकशी प्रमाणपत्र त्यांच्या संबंधीत कार्यालयाकडून प्राप्त होण्याच्या अधीन राहील.

५. नियुक्ती देण्यात येत असलेल्या या उमेदवारांनी नियुक्तीच्या/पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता विशिष्ट ठिकाणी पदस्थापना /नियुक्ती मिळविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधी/ खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०६१३००४१२५१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH JAIPRAKASH BARHATE

Digitally signed by DINESH JAIPRAKASH BARHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d2b949400dcd69ca2cd572e2ab1676bbc50eab4961e4bf4b8a6fc3d8b242711e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=375B2A0B3D3C850685CDBDA7427B95DCF37C814A2A1DA11BFDA199A0B7C55447, cn=DINESH JAIPRAKASH BARHATE
Date: 2024.03.07 10:09:50 +05'30'

**( दि.ज. बऱ्हाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार (ई-मेलद्वारे) यांनी मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे कार्यालयात हजर होण्याकरीता संपर्क साधावा.

**प्रत,**

१) महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा महाराष्ट्र मुंबई/नागपूर ,
२) मा. मंत्री (सां.बा.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
४) सचिव (बांधकामे/रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,कोकण
६) सर्व संबंधित अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळे
७) सह सचिव (सेवा/संनि),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन अधिकारी [आस्थापना-१/आस्थापना-३/सेवा-२],सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती, सेवा-३

शासन आदेश क्र.पदभ-२०२४/प्र.क्र.८१ (५)/सेवा-३, दि.०७.०३.२०२४ सोबतचे परिशिष्ट-अ

स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, गट-क (अराजपत्रित)

| अ.क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव इंग्रजीतून | उमेदवाराचे नाव मराठीतून | मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | पदस्थापना द्यावयाचा सा.बां.प्रादेशिक विभाग |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २६ | AKASH GANESH RAI | आकाश गणेश राय | खुला | खुला-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २ | ४१ | VAISHNAVI PRADEEP KULKARNI | वैष्णवी प्रदीप कुलकर्णी | खुला | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३ | ८६ | ROHIT ASHOK GAWAS | रोहित अशोक गावस | आ.दु.घ. | खुला-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४ | १०९ | SURAJ DADASAHEB JADHAV | सूरज दादासाहेब जाधव | खुला | खुला-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५ | ११६ | PRASHANT JIJABA IROLE | प्रशांत जिजाबा इरोळे | इ.मा.व. | खुला-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६ | १६१ | KALPESH VIKAS PATIL | कल्पेश विकास पाटील | इ.मा.व. | खुला-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ७ | १७९ | ABHISHEK SHRIKANT CHATUR | अभिषेक श्रीकांत चतुर | आ.दु.घ. | खुला-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ८ | २०५ | BHUSHAN KRISHNA RAWOOL | भूषण कृष्ण रावूल | आ.दु.घ. | खुला-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ९ | २१९ | SUSHANT BHIVA SAWANT | सुशांत भिवा सावंत | खुला | खुला-सर्वसाधारण against. अंशकालीन | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १० | २२१ | RUPESH UTTAM JADHAV | रुपेश उत्तम जाधव | अ.जा. | खुला-सर्वसाधारण against. अंशकालीन | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ११ | २३२ | VINITA RAJESH JAWAKE | विनिता राजेश जावके | खुला | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १२ | २४३ | ALPESH RAMCHANDRA FULORE | अल्पेश रामचंद्र फुलोरे | इ.मा.व. | खुला-सर्वसाधारण against. अंशकालीन | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १३ | २६४ | RUGVED MANGESH GAWAD | रुग्वेद मंगेश गावड | इ.मा.व. | इ.मा.व.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १४ | २९५ | RAJESH MUKUND FARDE | राजेश मुकुंद फर्डे | इ.मा.व. | इ.मा.व.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १५ | ३०९ | SAROJ SANJAY BIND | सरोज संजय बिंड | खुला | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १६ | ३५९ | AISHWARYA MAHESH CHANDIVADEKAR | ऐश्वर्या महेश चांदिवडेकर | इ.मा.व. | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १७ | ३६९ | SAURABH VILAS BAVDHANKAR | सौरभ विलास बावधनकर | इ.मा.व. | इ.मा.व.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १८ | ३७७ | TUSHAR SUDHIR KORADE | तुषार सुधीर कोराडे | आ.दु.घ. | आ.दु.घ.- सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| १९ | ३९१ | YOGESH RAMCHANDRA AAIR | योगेश रामचंद्र आयर | आ.दु.घ. | आ.दु.घ.- सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २० | ३९४ | SHRADDHA SHIVAJI DEVKAR | श्रद्धा शिवाजी देवकर | आ.दु.घ. | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २१ | ३९७ | VITTHAL TUKARAM RAWOOL | विठ्ठल तुकाराम राऊळ | आ.दु.घ. | आ.दु.घ.- सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २२ | ४११ | SOURABH SHRIRAM SHIGAVAN | सौरभ श्रीराम शिगवण | इ.मा.व. | इ.मा.व.-सर्वसाधारण against. अंशकालीन | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २३ | ४८५ | WAGHMARE PRASHANT SHIVAJI | वाघमारे प्रशांत शिवाजी | अ.जा. | अ.जा.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |

| अ.क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव इंग्रजीतून | उमेदवाराचे नाव मराठीतून | मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | पदस्थापना द्यावयाचा सा.बां.प्रादेशिक विभाग |
|---|---|---|---|---|---|---|
| २४ | ४९४ | CHINMAY AVINASH AHIRE | चिन्मय अविनाश अहिरे | अ.जा. | अ.जा.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २५ | ५४२ | PRATIK SURESH BHANDE | प्रतीक सुरेश भांडे | वि.मा.प्र. | वि.मा.प्र.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २६ | ५७१ | NEHA VILAS KALE | नेहा विलास काळे | आ.दु.घ. | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २७ | ५७२ | DIPA VINAYAK DANDKAR | दिपा विनायक दंडकर | इ.मा.व. | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २८ | ५७४ | JYOTI SHIVAJI PHONDE | ज्योती शिवाजी फोंडे | भ.ज.(क) | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| २९ | ५८० | VAIBHAVI MAHESH GORE | वैभवी महेश गोरे | भ.ज.(क) | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३० | ६२६ | KAJAL SURYAKANT SHELAR | काजल सूर्यकांत शेलार | इ.मा.व. | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३१ | ६३१ | MAYUR RAVINDRA MORE | मयूर रवींद्र मोरे | आ.दु.घ. | खुला-भूकंपग्रस्त | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३२ | ६४१ | HIMANSHU HANMANTH RAMRUPE | हिमांशू हणमंत रामरूपे | भ.ज.(ब) | भ.ज.(ब)-सर्वसाधारण against. अंशकालीन | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३३ | ६४८ | DHARMARAJ RAJU BHOI | धर्मराज राजू भोई | भ.ज.(ब) | भ.ज.(ब)-सर्वसाधारण against. अंशकालीन | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३४ | ६९५ | DIKSHA GAUTAM KAMBLE | दिक्षा गौतम कांबळे | अ.जा. | खुला-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३५ | ७०० | SONALI BABASAHEB KHODKE | सोनाली बाबासाहेब खोडके | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३६ | ७१४ | POONAM SHAM MHATRE | पूनम शाम म्हात्रे | इ.मा.व. | इ.मा.व.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३७ | ७३३ | VRUSHALI KAMLAKAR TARMALE | वृषाली कमलाकर तरमाले | इ.मा.व. | इ.मा.व.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३८ | ७४१ | JYOTI GORAKSHA BODKE | ज्योती गोरक्ष बोडके | भ.ज.(ड) | भ.ज.(ड)-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३९ | ७६२ | MAYURI PRADEEP GURAV | मयुरी प्रदीप गुरव | इ.मा.व. | इ.मा.व.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४० | ७६५ | DIPTI SUBHASH BIRWATKAR | दिप्ती सुभाष बिरवटकर | भ.ज.(ब) | भ.ज.(ब)-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४१ | ७९७ | HARSHADA SUNIL POIPKAR | हर्षदा सुनील पोईपकर | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४२ | ८४४ | MANISHA DINKAR NAIK | मनिषा दिनकर नाईक | अ.ज. | अ.ज.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४३ | ८४७ | HEMANGINI RAJU DAGALE | हेमांगिनी राजू डगळे | अ.ज. | अ.ज.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४४ | ८८४ | MINAL GAVHARLAL BAVISKAR | मीनल गव्हारलाल बाविस्कर | वि.मा.प्र. | वि.मा.प्र.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४५ | ८८८ | YUVRAJ JAYSING YASHWANTRAO | युवराज जयसिंग यशवंतराव | खुला | अनाथ- संस्थाबाह्य | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४६ | ८८९ | GEETA NAMDEV TUPE | गीता नामदेव तुपे | इ.मा.व. | इ.मा.व.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४७ | ८९० | ROHINI SARJERAO GAIKWAD | रोहिणी सर्जेराव गायकवाड | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |

| अ.क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव इंग्रजीतून | उमेदवाराचे नाव मराठीतून | मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | पदस्थापना द्यावयाचा सा.बां.प्रादेशिक विभाग |
|---|---|---|---|---|---|---|
| ४८ | ८९३ | PRANALI SITARAM GHARAT | प्रणाली सीताराम घरत | इ.मा.व. | इ.मा.व.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४९ | ९०० | GAURI YOGIRAJ GAIKWAD | गौरी योगीराज गायकवाड | अ.ज. | अ.ज.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५० | ९०२ | SAYALI RAVINDRA DEORE | सायली रवींद्र देवरे | इ.मा.व. | इ.मा.व.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५१ | ९०८ | BHAGYASHRI SUBHASH PATIL | भाग्यश्री सुभाष पाटील | इ.मा.व. | इ.मा.व.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५२ | ९१० | RUPESH RAJARAM KARKHILE | रुपेश राजाराम कारखिले | इ.मा.व. | इ.मा.व.-प्रकल्पग्रस्त | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५३ | ९१२ | BHAUSAHEB BINAJI PEDHEKAR | भाऊसाहेब बिनाजी पेढेकर | अ.ज. | अ.ज.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५४ | ९१३ | CHOLAN DIGAMBAR PAGARE | चोलन दिगंबर पगारे | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५५ | ९१५ | SONALI UTTAM GANGURDE | सोनाली उत्तम गांगुर्डे | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५६ | ९१६ | SHAM VASANT JAGTAP | शाम वसंत जगताप | अ.ज. | अ.ज.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५७ | ९१८ | MILIND SAYSING TADVI | मिलिंद म्हणत तडवी | अ.ज. | अ.ज.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५८ | ९२० | PRASHANT RAGHUNATH PAWAR | प्रशांत रघुनाथ पवार | अ.ज. | अ.ज.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ५९ | ९२२ | SHIVANI RAVINDRA KAJROLKAR | शिवानी रवींद्र काजरोळकर | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६० | ९२३ | GAURI DILIP PATHAK | गौरी दिलीप पाठक | आ.दु.घ. | आ.दु.घ.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६१ | ९३३ | GANESH DADASAHEB DHONE | गणेश दादासाहेब ढोणे | आ.दु.घ. | आ.दु.घ.-प्रकल्पग्रस्त | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६२ | ९३९ | POOJA SUNIL JAWARE | पूजा सुनील जवरे | आ.दु.घ. | आ.दु.घ.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६३ | ९४९ | ABHIJIT SADASHIV KADALE | अभिजित सदाशिव कडाळे | अ.ज. | अ.ज.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६४ | ९५० | URMILA SHAHAJI WAGHMARE | उर्मिला शहाजी वाघमारे | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६५ | ९५३ | ARCHANA RAMESH NIMBARE | अर्चना रमेश निंबरे | अ.ज. | अ.ज.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६६ | ९५८ | HARSHAL ANANT THAKUR | हर्षल अनंत ठाकूर | अ.ज. | अ.ज.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६७ | ९५९ | KOMAL CHANDRABHAN WAGH | कोमल चंद्रभान वाघ | अ.जा. | अ.जा.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६८ | ९७० | CHARUSHILA ARVIND GAVIT | चारुशीला अरविंद गावित | अ.ज. | अ.ज.-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ६९ | ९७७ | RUTIKA VASANT CHAVAN | रुतिका वसंत चव्हाण | वि.जा.(अ) | वि.जा.(अ)-महिला | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ७० | ९७८ | RUSHIKESH BALU BANDE | रुषिकेश बाळू बंडे | अ.ज. | अ.ज.-सर्वसाधारण | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ७१ | ९७९ | AKSHAY ANIL AHER | अक्षय अनिल आहेर | इ.मा.व. | खुला-खेळाडू | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |

